**जलसंपदा विभागातील अभियांत्रिकी सेवेतील गट-अ (राजपत्रित) व गट-ब (राजपत्रित / अराजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या नागरी सेवा मंडळांची कार्यकक्षा व कार्यप्रणाली .**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक, क्रमांक- नासेमं २०१४ /(प्र.क्र.१८/१४)/ आस्था (संनि)**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक :- २१.१०.२०१५

**संदर्भ** :- १. सा.प्र.विभागाचा शासन निर्णय,क्रमांक- एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक ३१ जानेवारी, २०१४.
२. जलसंपदा विभाग, शासन निर्णय, क्रमांक - नासेमं-२०१४/(प्र.क्र.१८/१४)/आस्था(संनि), दिनांक २९.८.२०१५.
३. जलसंपदा विभाग, शासन शुद्धीपत्रक, क्रमांक - नासेमं-२०१४/(प्र.क्र.१८/१४) /आस्था(संनि), दिनांक १६.९.२०१५.

**परिपत्रक :-**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय व संदर्भ क्र.२ येथील शुद्धीपत्रकान्वये जलसंपदा विभागातील क्षेत्रीय स्तरावरील गट-अ (राजपत्रित) व गट-ब (राजपत्रित / अराजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करण्यासाठी नागरी सेवा मंडळांची स्थापना करण्यात आली आहे. सदर नागरी सेवा मंडळांची कार्यकक्षा व कार्यप्रणाली निश्चित करण्यात येत आहे -

**नागरी सेवा मंडळाची कार्यकक्षा व कार्यप्रणाली :-**

१. पदोन्नती/बदलीबाबतचे मंत्रालयीन स्तरावरील प्रस्ताव संबंधित सह/उप सचिवांमार्फत अध्यक्ष, नागरी सेवा मंडळ यांचेकडे सादर करावेत.

२. नागरी सेवा मंडळाकडे प्रस्ताव सादर करताना त्यामध्ये खालील माहिती अंतर्भूत करावी -

अ. बदलीबाबतच्या प्रस्तावामध्ये खालील तपशील दर्शक माहिती व त्यांच्या पुष्टयर्थ दस्तऐवज असावेत -

1) प्रस्तावित बदलीसाठी अधिका-यांची पात्रता
2) विशेष बदली असल्यास त्याबाबतची कारणे

३) बदली प्रस्तावाचे समर्थन

ब. पदोन्नतीने नियुक्तीबाबतच्या प्रस्तावामध्ये खालील तपशील दर्शक माहिती व त्यांच्या पुष्टयर्थ दस्तऐवज असावेत -

१) पदोन्नतीस पात्र केल्याचा तपशील

२) संवर्ग वाटपाची मान्यता

३) विभागीय चौकशी किंवा गंभीर तक्रारींचा तपशील

३. नागरी सेवा मंडळाने प्रस्तावाबाबत शक्यतो एकमताने शिफारशी कराव्यात. प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून सात दिवसांत शिफारशी देणे बंधनकारक राहील.

४. काही अपरिहार्य कारणाने नागरी सेवा मंडळाच्या सदस्यांना एकत्रित बैठकीस विलंब होत असल्यास दूरध्वनीवरुन चर्चा करुन Circulation पध्दतीने शिफारशी करता येईल.

५. नागरी सेवा मंडळाने प्रस्तावातील बदल्या/नियुक्त्यांबाबत शासनाच्या प्रचलित तरतूदींचे पालन होते किवा कसे याबाबत अभिप्राय द्यावेत. विभागाने प्रस्तावित केलेल्या सविस्तर नियुक्तीबाबत शिफारशी देऊ नयेत. उदा. ठराविक अधिका-यांस /कर्मचा-यांस ठराविक ठिकाणी नियुक्ती.

६. अधिकारी/कर्मचारी यांच्या बदल्यांबाबत सध्या खालील संदर्भानुसार मार्गदर्शक सूचना प्रचलित आहेत. प्रस्तावित बदली प्रकरणांमध्ये प्रचलित तरतूदींचे पालन होते किवा कसे याबाबत नागरी सेवा मंडळाने अभिप्राय/शिफारशी द्याव्यात-

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

२) महाराष्ट्र शासकीय गट अ व गट ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५

३) यासंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना, परिपत्रके, शासन निर्णय इ.

७. पदोन्नतीने नियुक्त्यांसाठी सध्या खालील संदर्भानुसार मार्गदर्शक सूचना प्रचलित आहेत. त्यामधील तरतूदींची अंमलबजावणी होते किंवा कसे याबाबत समितीने शिफारशी द्याव्यात -

१) महाराष्ट्र शासकीय गट अ व गट ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५

२) यासंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना, परिपत्रके, शासन निर्णय इ.

८. विशेष बदली प्रस्तावित असल्यास त्याबाबतची कारणमिमांसा व क्षेत्रिय प्रस्ताव याबाबत नागरी सेवा मंडळाने अभिप्राय/शिफारशी द्याव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१५१०२११६१४३३८१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinayak Vishwanath Lawate

Digitally signed by Vinayak Vishwanath Lawate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vinayak Vishwanath Lawate
Date: 2015.10.21 16:17:47 +05'30'

**(विनायक लवटे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव/सचिव (जलसंपदा / लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक
४) महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
५) सर्व कार्यकारी संचालक, सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
८) महालेखापाल-१/२ , लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९) महालेखापाल-१/२, लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव
११) मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव.
१२) सह सचिव (सेवा) / उपसचिव (आस्था), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सहसचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कार्यासन अधिकारी - आस्थापना (मंत्रालय) / आस्थापना (तांत्रिक) / आस्थापना (अतांत्रिक), /आस्थापना (वर्ग-१) / आस्था (वर्ग-२) / आस्था (स.अ.श्रेणी-२) / आस्था (शाखा अभियंता) / / गोपनीय शाखा / नोंदणी / रोख शाखा, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) संग्रहार्थ / आस्था (संनि)